<u>प्रतिनियुक्तीने नियुक्ती</u>
**श्री.अरुणा जाधव, तहसिलदार**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन आदेश क्र. बदली-२०२४/प्र.क्र.१३१/ई-३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : ०३.०८.२०२४

**संदर्भ** :- १) महाराष्ट्र शासकीय कर्मचा-यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणा-या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५
२) भारत निवडणूक आयोगाचे क्र.२३/२०२४-ERS (Vol-II), दि.२६.०६.२०२४
३) भारत निवडणूक आयोगाचे क्र.४३७/६/१/INST/ECI/FUNCT/MCC/२०२४, (Vol-II), दि.३१.०७.२०२४

**शासन आदेश:-**

भारत निवडणूक आयोगाने संदर्भाधीन क्र. २ व ३ येथील पत्रान्वये विहित केलेल्या तरतुदी व महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडतांना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ च्या कलम ४(४) व ४ (५) व महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेत्तर सेवा आणि निलंबन, बडतर्फी, सेवेतून काढून टाकणे) नियम, १९८१ च्या नियम -४० मधील परिशिष्ट-२ मधील विहित अटी व शर्तींना अधीन राहून **श्रीमती अरुणा जाधव, अपर तहसिलदार (महसूल) जि.का.मुंबई उपनगर** यांची **धारावी पुनर्विकास प्रकल्प, झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरण, मुंबई येथील श्री. विजय तळेकर, तहसिलदार यांच्या प्रस्तावित बदलीने रिक्त होणा-या पदावर ३ वर्षाच्या कालावधीसाठी** सक्षम प्राधिका-यांच्या मान्यतेने सार्वजनिक सेवेच्या हितार्थ व प्रशासकीय सोयीच्या दृष्टीने प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्यात येत आहे.

२. **उपरोक्त अधिकारी हे निवडणूक कामकाजाकरिता अधिसूचित असलेल्या पदावर (AERO) कार्यरत असल्यास त्या पदावर नवीन अधिकारी कार्यभार घेईपर्यंत बदली झालेल्या अधिका-यास कार्यमुक्त करण्यात येऊ नये.** उपरोक्त अधिका-यांना कार्यमुक्त करण्यात आल्याचा दिनांक तसेच नवीन नियुक्तीच्या जागी हजर झाल्याचा दिनांक याबाबत e3.revenue@maharashtra.gov.in या ई-मेलद्वारे/ टपालाद्वारे शासनास त्वरित कळवावे. तसेच सदर पदावर कार्यरत असलेल्या श्री. विजय तळेकर, तहसिलदार यांच्या पदस्थापनेचे आदेश स्वतंत्ररित्या निर्गमित करण्यात येतील.

३. धारावी पुनर्वसन प्रकल्प, झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरण, मुंबई या कार्यालयातील प्रतिनियुक्तीच्या अनुषंगाने श्रीमती अरुणा जाधव, अपर तहसिलदार (महसूल) जि.का.मुंबई उपनगर यांच्या सेवा अपर मुख्य सचिव, गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई यांचेकडे सुपूर्द करण्यात येत आहेत.

४. श्रीमती अरुणा जाधव, अपर तहसिलदार (महसूल) जि.का.मुंबई उपनगर यांनी पुढील सूचनांसाठी अपर मुख्य सचिव, गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई यांचेकडे हजर व्हावे.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०८०३१९००१०९२१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PRASHANT PRALHAD SAPKAL

Digitally signed by PRASHANT PRALHAD SAPKAL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT,
2.5.4.20=c2ec242caef55e035a22245b60a2752c90753e697f5e56596b3524d34280a891, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=9548CB33E24729A59B6A5C72EE905604BA53420C8EACFD34E9E8C2460B8AA409, cn=PRASHANT PRALHAD SAPKAL
Date: 2024.08.03 19:17:13 +05'30'

**( प्रशांत सपकळ )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

- अपर मुख्य सचिव, गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई
- विभागीय आयुक्त, कोकण.

**प्रत,**

- मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
- मा. उप मुख्यमंत्री (गृह) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
- मा. उप मुख्यमंत्री (वित्त) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
- मा.मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
- संबंधित जिल्हाधिकारी.
- प्रधान महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखा परीक्षा), मुंबई/ नागपूर.
- संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी.
- संबंधित अधिदान व लेखा अधिकारी.
- संबंधित आहरण व संवितरण अधिकारी.
- अपर मुख्य सचिव (महसूल) यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
- संबंधित तहसिलदार (विभागीय आयुक्त, कोकण यांचेमार्फत).
- सह सचिव (ई-३) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
- निवडनस्ती (ई-३).